सक्तीचा प्रतीक्षा कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करण्याबाबत.
श्री.उ.कि.सकवान, सहायक संचालक, जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, नांदेड

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०१६/प्र.क्र.११०/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : १८ ऑगस्ट, २०१७.

**वाचा** :
१) शासन आदेश, आदिवासी विकास विभाग, क्रमांक आस्था-२०१३/प्र.क्र.३०/का.१५, दिनांक १८.०५.२०१३.
२) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पुसद जि.यवतमाळ यांचे दिनांक ०१.०८.२०१६ चे पत्र.
३) श्री. उ. कि. सकवान, सहायक संचालक यांचा दिनांक ०८.०८.२०१६ चा विनंती अर्ज.
४) शासन आदेश, दिनांक ०१.१२.२०१६
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक सेनिवे १००१/१३०/सेवा-४, दिनांक ०२.०६.२००३.

**शासन निर्णय :**

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील श्री. उ. कि. सकवान, सहायक संचालक, गट-अ यांची आदिवासी विकास विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन आदेशान्वये प्रकल्प अधिकारी म्हणून एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पुसद जि.यवतमाळ या कार्यालयात प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. श्री. सकवान यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी संपुष्टात आल्याने प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पुसद जि.यवतमाळ या कार्यालयाने संदर्भाधिन क्रमांक २ येथील पत्रान्वये श्री. उ. कि. सकवान यांना दिनांक ०१/०८/२०१६ (म.नं.) रोजी कार्यमुक्त केले आहे. श्री. उ. कि. सकवान यांनी दिनांक ०८/०८/२०१६ च्या अर्जान्वये ते नियत वयोमानाने जुलै, २०१९ मध्ये शासकीय सेवेतून सेवानिवृत्त होत असल्याने त्यांनी नांदेड येथील सहायक संचालक, गट-अ या पदावर पदस्थापना देण्याची विनंती केली होती. त्याअनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन आदेशान्वये श्री. उ. कि. सकवान यांची प्रत्यावर्तनानंतरची पदस्थापना सहायक संचालक, जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, नांदेड या पदावर करण्यात आली आहे. तसेच श्री.सकवान हे दिनांक ०१.१२.२०१६ (म.नं.) नियुक्तीच्या ठिकाणी रुजू झाले आहेत.

२. श्री.उ.कि.सकवान, सहायक संचालक, जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, नांदेड यांचा, त्यांची सेवा मूळ विभागात प्रत्यावर्तनापासून ते त्यांच्या पदस्थापनेच्या नियुक्ती ठिकाणी रुजू होण्यापर्यंतचा म्हणजेच दिनांक ०१.०८.२०१६ (म.नं.) ते ०१.१२.२०१६ (म.नं.) पर्यंतचा सक्तीचा प्रतीक्षा कालावधी “कर्तव्य कालावधी” म्हणून नियमित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. प्रमाणित करण्यात येते की, पदस्थापनेस लागणारा विलंब हा प्रशासकीय कारणास्तव आहे. श्री.सकवान यांची सेवा मूळ विभागात प्रत्यावर्तीत करण्यात आल्यानंतर रिक्त पदांची माहिती उपलब्ध करुन घेतल्यानंतर त्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी पाठविल्यानंतर त्यास मान्यता मिळाल्यानंतर श्री.सकवान यांना पदस्थापना देण्यात आलेली आहे.

४. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ९(१४)(एफ्) मधील तरतुदीनुसार, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक सेनिवे १००१/१३०/सेवा-४, दिनांक ०२.०६.२००३ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार शासनाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१८१५०४१७११०३ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Baban Sheshrao Mandwe

Digitally signed by Baban Sheshrao Mandwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development And Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d101a905c7fca95ea9a4a68053d53dda9fcd8b54a203c383517611e96421b187, cn=Baban Sheshrao Mandwe
Date: 2017.08.18 14:54:25 +05'30'

**( ब.शे.मांडवे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र २, नागपूर,
२. मा. मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई
४. उप संचालक, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, विभागीय मुख्यालय, औरंगाबाद (संचालनालयामार्फत)
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
६. श्री.उ.कि.सकवान, सहायक संचालक, जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, नांदेड (संचालनालयामार्फत).
७. निवड नस्ती.